## पोपटाचे शिक्षण

ही श्रेष्ठ कथा नोबेल पारितोषिक विजेते रवींद्रनाथ टागोर यांनी १९२४ मध्ये लिहिली आहे. जी बरेच काही सांगून जाते.

कोणे एके काळी एक पक्षी होता. तो अडाणी होता. खरे तर तो सुरेल गायचा, पण श्लोक वगैरे म्हणायचा नाही. तो सुरेख उडायचा, पण वागण्याचे नियम पाळत नव्हता.

राजा स्वतःशीच उद्गारला, ''अडाणीपणा काही उपयोगाचा नाही.'' ज्याप्रमाणे मूर्ख लोक खूप खातात, पण त्यातून निष्पन्न काहीच होत नाही.

त्याने त्याच्या भाच्याला बोलावले आणि सांगितले की, पक्ष्याला चांगले शिक्षण देणे गरजेचे आहे.

मग काय पंडितांना फर्मान निघाले आणि ते या गोष्टीच्या मुळापर्यंत जाऊन पोहोचले. त्यांनी निर्णय घेतला की, पक्ष्याच्या अडाणीपणाला त्याची भिकारड्या घरट्यात राहण्याची नैसर्गिक सवय कारणीभूत आहे. त्यामुळे पंडितांच्या म्हणण्याप्रमाणे शिक्षणासाठी पहिली गरजेची गोष्ट म्हणजे पक्ष्याला उत्तम पिंजरा आणणे.



पंडितांना त्यांची बिदागी मिळाली आणि ते संतुष्ट मनाने घरी गेले.

एक सोन्याचा उत्कृष्टपणे सजविलेला पिंजरा बनविण्यात आला. जगभरातून लोक तो पाहायला गर्दी करू लागले.

संस्कृतीच पिंजऱ्यात जतन झाली आहे, लोक म्हणत. हर्षोन्मादाने कित्येकांना तो पाहून आनंदाश्रू आवरले नाहीत.

इतर काही म्हणाले, 'संस्कृती जरी जपली गेली नाही तरी पिंजरा एक मौल्यवान सत्य बनून राहील. हा पक्षी किती भाग्यवान आहे.'

सोनाराने त्याची थैली इनामाच्या पैशांनी भरून घेतली आणि क्षणाचाही विलंब न करता घराच्या दिशेने प्रस्थान केले.

मग पंडित पक्ष्याला शिकवायला बसले. सावकाशपणे त्यांनी तपकीर ओढली आणि म्हणाले की, आपल्या उद्देशासाठी पाठ्यपुस्तके कधीच कमी पडणार नाहीत.

राजाच्या भाच्यांनी हस्तलिखित बनवणारी अनेक माणसे एकत्र केली. त्यांनी पुस्तकांमधून, पुस्तकांच्या प्रतींमधून इतकी हस्तलिखिते बनवली की त्यांचा एक डोंगरच तयार झाला.

मग लोक कुजबुजले, 'वा ! संस्कृतीचा मनोरा.. किती उंच ! त्याचे एक टोक तर गगनाला भिडले आहे.'

मग लिपिक हलक्या मनाने व जड खिशांनी त्वरित घराकडे परतले.

पिंजरा सुस्थितीत ठेवण्यासाठी भाचे मंडळी झटत होती.

पिंजरा घासूनपुसून लख्ख ठेवला जात असलेला पाहून लोक समाधानाने म्हणत, ''हीच प्रगती आहे.''

अनेक माणसे या कामात गर्क होती. त्यांच्यावरचे पर्यवेक्षक तर त्यांच्याहून जास्त संख्येने होते. हे सर्व त्यांच्या जवळच्या आणि लांबच्या नातेवाइकांसह राजवाडे बांधून त्यानंतर कायम तिथे राहिले.

जगात बाकी कितीही गोष्टींची कमतरता असली तरी निंदा करणाऱ्यांचे कधीच दुर्भिक्ष नसते. ते म्हणत होते की, फक्त पक्षी सोडून पिंजऱ्याला दुरूनही संबंधित असणाऱ्या सर्व जणांची शब्दांत वर्णन न करण्याइतकी भरभराट झाली आहे.

राजाच्या कानावर हे पडताच त्याने भाच्यांना बोलावणे धाडले आणि विचारले, ''हे मी काय ऐकतो आहे?''

भाच्यांनी उत्तर दिले, ''महाराज, जर सत्य जाणून घ्यायचे असेल तर सोनार, पंडित, लिपिक आणि पर्यवेक्षक या सर्वांची सुनावणी करायला हवी. निंदकांना नीट खायला न मिळाल्यामुळे त्यांच्या जिभा अशा लांब झाल्या आहेत.''

हे स्पष्टीकरण इतके समाधानकारक होते की, त्या प्रत्येकाला राजाने आपल्याकडील दुर्मीळ रत्नांनी मढविले.

शेवटी राजाला स्वतःच्या डोळ्यांनी त्याचे शिक्षणखाते पक्ष्याला कसे शिकवते आहे हे पाहण्याची इच्छा झाली आणि तो शिक्षणाच्या उच्च दालनात प्रवेश करता झाला.

फाटकापासूनच शंख, तुताऱ्या, ढोल, ताशे, तंबोरे, बासरी बॅगपाईप अशा वाद्यांचा आवाज ऐकू येऊ लागला.

पंडितांनी उच्चरवाने मंत्रघोष करायला सुरुवात केली. सोनार, लिपिक, पर्यवेक्षक आणि त्यांचे अगणित नातेवाईक जोरजोरात हर्षोद्गार काढू लागले.

भाच्यांनी सस्मित मुद्रेने विचारले, ''महाराज, काय वाटते आपल्याला या सर्वांबद्दल ?''

राजा म्हणाला, ''हा शिक्षणातील एक महान प्रयोग वाटतो आहे.''

प्रफुल्लित मनाने राजा परत जाण्यासाठी त्याच्या हत्तीवर स्वार होणार इतक्यात मागून एक निंदक ओरडला, ''महाराज तुम्ही पक्ष्याला पाहिले का ?''



'अरे नाही' राजा उद्गारला, ''मी पक्ष्याला पूर्णपणे विसरून गेलो.''

मागे फिरून त्याने पंडितांना पक्ष्याला शिकवण्याच्या पद्धतीविषयी विचारले.

त्याला ती दाखविण्यात आली. त्याच्यावर या सगळ्याची छाप पडली. ती पद्धतच इतकी छान होती की, यात पक्षी बिनमहत्त्वाचा वाटत होता. या सगळ्या आयोजनात काहीच त्रुटी नव्हती. त्यामुळे राजाला फार समाधान वाटले.

आता त्या पक्ष्याची काही तक्रार असणे तर अशक्यच होते. त्याचा घसा पुस्तकातील पानांनी इतका भरला होता की, तो शीळ तर सोडाच कुजबुजण्याचा आवाज सुद्धा काढू शकत नव्हता. ही पद्धत बघणाऱ्याच्या शरीरावर रोमांच उभे राहत होते.

यावेळी परत हत्तीवर चढताना त्याच्या राज्यातील कान पिळणाऱ्यांना राजाने निंदकांचे कान नीट पिळायची आज्ञा दिली.

याप्रकारे तो पक्षी व्यवस्थितपणे भ्रमिष्ट होण्याच्या मार्गाला लागला. वस्तुत: त्याची प्रगती अगदी समाधानकारक झाली होती, परंतु कधीकधी प्रशिक्षणावर नैसर्गिक उर्मी मात करायची आणि सकाळी सोनेरी सूर्यकिरणे पिंजऱ्यात प्रवेश करत, तेव्हा तो पंखांची फडफड करायचा. आणि हे अविश्वसनीय वाटेल. पण तो त्याची क्षीण चोच पिंजऱ्यावर आपटायचा.

''काय हा उद्धटपणा?'' कोतवाल गरजला.

लोहार त्याची छिन्नी हातोडी घेऊन आला आणि राजाच्या शिक्षणखात्यात त्यानेही स्थान मिळविले. कोणता बरे हा नाद? थोड्याच वेळात लोखंडी साखळी तयार झाली आणि पक्ष्याचे पंख बंदिस्त झाले.

राजाचे मेव्हणे एकत्र झाले आणि म्हणू लागले या पक्ष्यांमध्ये चांगल्या विचारांची कमतरता तर आहेच, पण त्याला कृतज्ञता देखील वाटत नाही.

एका हातात पाठ्यपुस्तक आणि दुसऱ्या हातात छडी घेऊन पंडित त्या गरीब पक्ष्याला जे देत होते ते म्हणजे धडे. कोतवालाला त्याच्या योग्य निरीक्षणाबद्दल आणि लोहाराला लोखंडी साखळ्या बनविल्याबद्दल बक्षिसे देण्यात आली. पक्षी मरण पावला. हे कधी घडले याची पुसटशी कल्पना देखील कोणालाच नव्हती. ही अफवा पसरणारा पहिला माणूस होता निंदक..

राजाने आपल्या भाच्यांना बोलॉवून विचारले, ''माझ्या प्रिय मित्रांनो, हे मी काय ऐकतो आहे?''

भाचा म्हणाला, ''महाराज, त्या पक्ष्याचे शिक्षण पूर्ण झाले.''

''तो उड्या मारतो?'' राजाने विचारले.

''अजिबात नाही.''

''तो उडतो?''

''नाही.''

''पक्ष्याला माझ्याकडे आणा.'' राजा म्हणाला.

पक्षी कोतवाल आणि शिपायांच्या पहाऱ्यात त्याच्याकडे आणला गेला. राजाने बोटाने पक्ष्याला चाळविले. फक्त पुस्तकांच्या पानांचा खसपस आवाज आला.

खिडकीबाहेर.. नवीन पालवी फुटलेल्या अशोक वृक्षातून वाहणारी वसंतऋतूची मंद झुळूक एप्रिलची सकाळ विषण्ण करत होती.

**(चित्रे : कामिरित्थू)**